महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, औरंगाबाद मौजे कांचनवाडी येथील मुला-मुलींचे वसतिगृह बांधकामास निधी वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्र. एनएलयु-२०१९/प्र.क्र.८६/विशि-२**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : १७ नोव्हेंबर, २०२१.

**संदर्भ :-** (१) दि.१९.०७.२०१९ रोजी झालेल्या उच्चाधिकार समितीच्या बैठकीचे इतिवृत्त.
(२) शासन निर्णय समक्रमांक दि.२५.०६.२०१९.
(३) शासन निर्णय समक्रमांक दि.१३.०८.२०१९.
(४) शासन निर्णय समक्रमांक दि.२३.०८.२०१९.
(५) शासन निर्णय समक्रमांक दि.१४.०१.२०२१.
(६) शासन निर्णय समक्रमांक दि.१०.०६.२०२१.
(७) कुलगुरु, महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, औरंगाबाद यांचे दि.३०.०९.२०२१ रोजीचे पत्र.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्यात मुंबई, नागपूर व औरंगाबाद येथे विधी विद्यापीठाची स्थापना करण्यास मंत्रीमंडळाने मान्यता दिली आहे. सदर मान्यतेनुसार महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, औरंगाबाद येथे मौजे कांचनवाडी परिसरात बांधकामासाठी रु.१४९.७२ कोटी शासनाकडून टप्प्या-टप्पाने उपलब्ध करून देण्यास संदर्भ क्र.४ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. तसेच सदर बांधकामात Centre of Excellence या इमारतीचा समावेश करण्यास संदर्भ क्र.५ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. तद्नंतर प्रशासकीय मान्यतेस अनुसरुन Centre of Excellence करीता रु.१०५५.३४ लक्ष इतका निधी संदर्भ क्र.३ व ५ येथील शासन निर्णयान्वये तसेच मुलां-मुलींच्या वसतिगृहाकरीता रु.१०००.०० लक्ष इतका निधी संदर्भ क्र.६ येथील शासन निर्णयान्वये वितरीत केला आहे. आता मुलां-मुलींचे वसतीगृहाचे बांधकाम प्रगतीपथावर असून, वसतीगृहाचे बांधकाम तातडीने पूर्ण करुन विद्यार्थ्यांकरीता वापरावयास उपलब्ध करुन द्यावयाचे असल्याने निधी वितरीत करण्याची मागणी संदर्भ क्र.७ येथील पत्रान्वये विद्यापीठाने केली आहे. सदर मागणीच्या अनुषंगाने मुला-मुलींचे वसतिगृहाच्या बांधकामाची प्रगती विचारात घेता मुला-मुलींच्या वसतिगृहाकरीता रु.१२,०४,००,०००/- (अक्षरी रुपये बारा कोटी चार लक्ष फक्त) इतका निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, औरंगाबाद यांना मौजा कांचनवाडी परिसरातील मुला-मुलींचे वसतिगृह बांधकामाकरिता रु.१२,०४,००,०००/- (अक्षरी रुपये बारा कोटी चार लक्ष फक्त) इतका निधी खालील अटींच्या अधीन राहून मंजूर करण्यात येत आहे.

(१) महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ अधिनियम २०१४ नुसार शासनाकडून मंजूर झालेले अनुदान हे विद्यापीठ निधीत जमा करुन अनुदानाचे व्यवस्थापन करण्याची जबाबदारी कार्यकारी परिषदेची असेल. तसेच सदर अनुदानातून करण्यात आलेल्या खर्चाचे विनिमय करुन खर्चाच्या लेख्यांचे विवरणपत्र महापरिषदेपुढे ठेवून त्यास मान्यता घेण्याची कार्यवाही विद्यापीठाने करावी.

(२) कुलगुरु, महाराष्ट्र राष्टीय विधी विद्यापीठ, औरंगाबाद यांना शासनाकडून ज्या प्रयोजनार्थ अनुदान मंजूर करण्यात आलेले आहे, हे अनुदान त्याच प्रयोजनार्थ खर्च करण्यात आले आहे, हे पाहण्याची जबाबदारी कुलगुरु यांची असेल. यासंदर्भात त्यांनी कार्यकारी परिषदेची मान्यता घेऊन त्याचे उपयोगिता प्रमाणपत्र उच्च शिक्षण संचालनालयामार्फत शासनास सादर करावे.

(३) वरील सर्व अनुदानाची सर्व कागदपत्रे व हिशेब महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई किंवा प्रकरणपरत्वे महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर यांनी सदर कामाकरिता प्राधिकृत केलेले अधिकारी यांना तपासण्याचे अधिकार असून, त्यांनी मागणी केल्यास, सर्व कागदपत्रे त्यांचेकडे तपासणीकरिता विधी विद्यापीठाने सादर केली पाहिजेत.

(४) विद्यापीठास ज्या उद्दिष्टासाठी अनुदान मंजूर केलेले आहे त्याच उद्दिष्टासाठी मंजूर केलेल्या अनुदानाचा वापर करावा.

(५) यासंदर्भात वित्तीय अधिकार नियम पुस्तिकेतील तरतुदी व अटीचे ततोतंत पालन करावे. तसेच शासनाच्या प्रचलित नियम व अटी, शर्ती विचारात घेऊन कार्यवाही करण्यात यावी.

२. सदरहू मंजूर झालेली तरतुद महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, औरंगाबाद यांना तातडीने सुपूर्द करण्याची सर्वस्वी जबाबदारी संचालक (उच्च शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांची राहील. तसेच वरील अनुदानाची सर्व कागदपत्रे व हिशेब महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई किंवा प्रकरणपरत्वे महालेखापाल-२, नागपूर यांनी सदर कामाकरीता प्राधिकृत केलेले अधिकारी यांना तपासण्याचे अधिकार असून, त्यांनी मागणी केल्यास, सर्व कागदपत्रे त्यांच्याकडे तपासणीकरीता विद्यापीठाने सादर केली पाहिजेत. विद्यापीठास ज्या उद्दिष्टासाठी मंजुर केलेल्या अनुदानाचा वापर त्याच उद्दिष्टासाठी करावा. तसेच विहीत कालावधीमध्ये सदरचा खर्च पूर्णपणे करण्यात येईल याची दक्षता घेण्यात यावी आणि त्याबाबतचे विनियोग प्रमाणपत्र (Utilization Certificate) संचालक, उच्च शिक्षण, पुणे यांचेमार्फत शासनास विहित वेळेत सादर करण्यात यावे.

३. सदर खर्च "मागणी क्रमांक - डब्ल्यु-२, प्रधानशिर्ष- २२०२- सर्वसाधारण शिक्षण, ०३- विद्यापीठीय व उच्च शिक्षण, १०२- विद्यापीठांना सहाय्य, - (००) (२१) विधी विद्यापीठाचा विकास (२२०२ जी ९५९), ३१ सहाय्यक अनुदाने" या लेखाशिर्षाखाली सन २०२१-२०२२ मधील मंजूर तरतुदीतून खर्ची टाकण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे अनौपचारिक संदर्भ क्र.९७४/२०२१/व्यय-५, दि.०२.११.२०२१ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२१११७१३०११३२९०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

AJIT MADHUKARRAO BAWISKAR

Digitally signed by AJIT MADHUKARRAO BAWISKAR
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=HIGHER AND TECHNICAL DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=880d8eb755bcb4455fa360baaa8797820b6265d75275a72f9fa31977bfeff4c9, serialNumber=99eb928028df71ebdfcd2898e209d499192ad3899261fead42f7d38a3141ab69, cn=AJIT MADHUKARRAO BAWISKAR
Date: 2021.11.17 13:02:41 +05'30'

**( अ. म. बाविस्कर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई,
२. उप सचिव, मा. मुख्य सचिव यांचे यांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई
३. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे. (५ प्रती)
४. कुलगुरु, महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, औरंगाबाद
५. कुलसचिव, महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, औरंगाबाद
६. सहसंचालक (उच्च शिक्षण), औरंगाबाद विभाग, औरंगाबाद
७. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर
८. महालेखापाल, (लेखा परीक्षण) -२, महाराष्ट्र, नागपूर
९. अधिदान व लेखा अधिकारी, पुणे/ औरंगाबाद
१०. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे/ औरंगाबाद
११. कार्यासन अधिकारी (का-१४७१), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. वित्त विभाग,(व्यय-५) (अर्थसंकल्प-३/८) मंत्रालय, मुंबई.
१३. कक्ष अधिकारी (इमा-३), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. मा.प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
१५. कार्यासन अधिकारी (साशि-१), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई यांना कळविण्यात येते की, उपरोक्त वितरीत करण्यात आलेला निधी तात्काळ BDS प्रणालीवर उपलब्ध करून देण्यात यावा.
१६. निवड नस्ती (विशि-२), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.